**प्रस्तावित प्रारुप परिच्छेदांचे स्पष्टीकरण विहित कालावधीत शासनास सादर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन परिपत्रक क्र. प्रपाप २०१५/प्र.क्र.३५/लेखापरिक्षा**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३ सप्टेंबर, २०१५

**संदर्भ** :- शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.डीएपी-२००४/
प्र.क्र.४९/लेखापरिक्षा, दि.१३.१.२००६

**परिपत्रक :**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालयांचे महालेखापाल कार्यालयाकडून केल्या जाणाऱ्या लेखापरिक्षाअंती, काही महत्वाच्या मुद्यांबाबत उपस्थित केलेल्या आक्षेपांच्या संदर्भात, प्रस्तावित प्रारुप परिच्छेद किंवा स्टेटमेंट ऑफ फॅक्ट्स याव्दारे, शासन स्तरावरील आवश्यक ते स्पष्टीकरण सादर करण्याबाबत, महालेखापाल कार्यालयांकडून शासनास विनंती केली जाते. सदर स्पष्टीकरण **६ आठवड्यात** महालेखापालांना पाठविणे आवश्यक असते.

२. वरीलप्रमाणे, विहित कालावधीत कार्यवाही न झाल्यास, महालेखापालांनी घेतलेले आक्षेप शासनास मान्य् असल्याचे गृहीत धरुन सदर आक्षेप, प्रारुप परिच्छेदांच्या स्वरुपात, भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या अहवालात समाविष्ट् केले जातात. यावर लोकलेखा समितीव्दारे सुनावणी आयोजित केली जावून सचिव महोदयांना साक्षीस सामोरे जावे लागते. ही बाब टाळण्याच्या दृष्टीने, प्रस्तावित प्रारुप परिच्छेदावर वेळीच योग्य् ते स्पष्टीकरण महालेखापाल यांच्या कार्यालयास सादर होणे अत्यंत गरजेचे असते. यासंदर्भात शासन परिपत्रक दि.१३.१.२००६ अन्वये आवश्यकते निदेशही देण्यात आलेले आहेत. असे असूनही, या संदर्भात उचित कार्यवाही केली जात नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे.

२. प्रस्तावित प्रारुप परिच्छेद शासनास प्राप्त् झाल्यावर तातडीने आवश्यक त्या स्पष्टीकरणासाठी / अधिक माहितीसाठी शासनास सादर होण्यासाठी मुख्य् अभियंता यांना पाठविण्यात येतात. परंतु क्षेत्रीय अधिकाऱ्यांकडून बऱ्याच वेळेस स्पष्टीकरण/अधिक माहिती शासनास वेळेवर प्राप्त् होत नाही. काही प्रकरणी हा विलंब अत्यंत दिर्घ असा असतो. या विलंबाबाबत महालेखापालांकडून तीव्र् नापसंतीही व्यक्त् केली जाते.

३. यास्त्व, आता या परिपत्रकाव्दारे अशा सूचना देण्यात येत आहेत की, प्रारुप परिच्छेदांबाबतचे स्पष्टीकरण / अधिक माहिती, इंग्रजी / मराठीमध्ये आवश्यक त्या कागदपत्रासह व संबंधीत अधिकाऱ्यांचे अभिप्रायासह शासनास दोन आठवड्याच्या मुदतीत सादर करण्याबाबत सर्व मुख्य् अभियंता यांनी काटेकोरपणे व कटाक्षाने दक्षता घ्यावी. याबाबत हयगय झाल्याचे आढळून आल्यास **संबंधीत दोषी अधिकारी / कर्मचारी यांचे विरुध्द् शिस्तभंगाची कारवाई प्रस्तावित** करण्यात येईल, याची कृपया सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. प्रस्तुत आदेश, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सर्व कार्यालयांना अवगत करण्याबाबत मुख्य् अभियंता यांनी तात्काळ कार्यवाही करावी.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०३१२४४२९६४१८ असा आहे. हा आदेश् डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Fulchand Sakharam Meshram

Digitally signed by Fulchand Sakharam Meshram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Fulchand Sakharam Meshram
Date: 2015.09.03 12:50:59 +05'30'

**( फु. स. मेश्राम )**
उप सचिव तथा आं.वि.स.

**प्रत,**

१) सर्व मुख्य् अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
२) सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
३) सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
४) प्रधान महालेखापाल (लेप)-१, महाराष्ट्र राज्य्, मुंबई
५) प्रधान महालेखापाल (लेप)-२, महाराष्ट्र राज्य्, नागपूर